मौजे ऐनखेड,(ता.चिखली,जि.बुलढाणा )
येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत
अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता
देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रमा २११५/प्र.क्र.२१८/पापु १३**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः ८ सप्टेंबर,२०१५**

**वाचा -**

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा यांचे पत्र क्र.बुजिप/ग्रापापुवि/तांशा/९३४/२०१४ दि.१४/०८/२०१४

२) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलढाणा यांचे पत्र क्र. बुजिप/ग्रापापुवि/८७७/२०१५,दि.०६/०७/२०१५

३) शासन निर्णय ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७,दि.२०/०२/२०१५

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे ऐनखेड,(ता.चिखली,जि.बुलढाणा) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.३०,८३,८२० (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास ग्राम सभा ऐनखेड यांनी दिनांक १५/०८/२०१४ च्या ठराव क्र.३ अन्वये मूळ प्रशासकीय मान्यता दिली होती. सदर योजनेची मूळ दरसूची सन २०१३-१४ असून मूळ योजनेत महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी कडून प्राप्त झालेल्या इलेक्ट्रीक कनेक्शनच्या शुल्क(मागणी) मध्ये वाढ झाल्याने योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यामुळे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी संदर्भाधिन पत्र क्र.१ अन्वये योजनेस सुधारीत तांत्रिक मान्यता दिलेली आहे. यास्तव मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलढाणा यांनी प्रस्तुत योजनेच्या रु.३५,०१,३८५/- किंमतीच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये केली आहे. विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदेकडील पाणी पुरवठा योजनांसाठी प्रशासकीय कामासाठी ९% ऐवजी ४% खर्च अनुज्ञेय ठेवण्यात आला आहे.यास्तव मौजे ऐनखेड,(ता.चिखली,जि.बुलढाणा) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या निव्वळ वाढीव रकमेवर९%

ऐवजी ४% प्रशासकीय खर्च धरुन आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय -

मौजे ऐनखेड,(ता.चिखली,जि.बुलढाणा) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.३५,०१,३८५/- (ढोबळ) (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष एक हजार तीनशे पंच्याऐंशी फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** पुढील अटींच्या अधिन राहून **सुधारीत प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत योजनेची उर्वरित कामे ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत. प्रस्तुत योजनेच्या खर्चात वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. तसेच योजनेची कामे पूर्ण करुन योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारण्यात येणाऱ्या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वयंनिर्भर होईल याची जबाबदारी जिल्हा परिषद, बुलढाणा व ऐनखेड ग्रामपंचायत यांची राहील. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वेळोवेळी वाढ करणे बंधनकारक राहील.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत करण्यात येऊ नये.

६. सदर योजना पूर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबधित ग्राम पंचायत/जिल्हा परिषद ) योजना हस्तांतरीत करुन घेणे बंधनकारक राहील.

७. या योजनेवरील सुधारित किंमतीतील **रु.४,१८,१०५/- (अक्षरी रुपये चार लक्ष अठरा हजार एकशे पाच फक्त)** एवढा वाढीव खर्च हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून जिल्हा परिषदेस उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम,भाग-२ दि.१७/०४/२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र.६ (सहा) परिच्छेद क्र.२७(अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे .

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०८१५५९१०५९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.09.08 17:18:26 +05'30'

**( सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
४) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
५) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा
७) अधीक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष,विभाग अमरावती.
८) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलढाणा.
९) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, बुलढाणा
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा.
११) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) कार्यासन क्र.पापु-.४,६,७,९,१७, व १८ पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.